कौशल्य विकास व उद्योजकता विभाग (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यन्त मुदतवाढ देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
कौशल्य विकास व उद्योजकता विभाग
शासन निर्णय क्रमांक- अस्थाप-२०२०/प्र.क्र.५४ /प्रशा-१
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १०/०९/२०२०

वाचा:-
१. रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-२००१/ प्र.क्र.१०९/ प्रशा-१, दिनांक ०५.०३.२००३.
२. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. अस्थाप-२०२०/ प्र.क्र.५४/प्रशा-१, दिनांक ०२.०३.२०२०.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२०.

प्रस्तावना:-

कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतिबंध वरील संदर्भाधिन क्रमांक -१ येथील दि.५ मार्च २००३ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेला आहे.

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागाच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील ४८ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक ३१.०८.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

शासन निर्णय:-

कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील विविध संवर्गातील सोबतच्या विवरणपत्र " अ " मध्ये दर्शविण्यात आलेल्या ४८ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभागातील ४८ अस्थायी पदांसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक, "झेडए-२, २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा, ०९०, सचिवालय, (०१)(०१) रोजगार व

स्वयंरोजगार विभाग (२२५१ ०५१६) दत्तमत" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या उक्त संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३१.०८.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१०१२५३५९७८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Skill Development and Entrepreneurship Department, Government Of Maharashtra, ou=eOffice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2020.09.15 15:42:44 +05'30'

**( संतोष रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई.
२. अ.मु.स., कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी , अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
५. वित्त विभाग, (व्यय-६/वित्तीय सुधारणा), मंत्रालय,मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन १८, र. व का.),मंत्रालय,मुंबई.
७. कार्यासन अधिकारी,रोख शाखा,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (प्रशा-१).

## विवरणपत्र -अ

शासन निर्णय क्र. अस्थाप-२०२०/ प्र.क्र.५४/प्रशा-१, दिनांक १०.०९.२०२० अन्वये ४८ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.

| अ.क्र. | पदांचा संवर्ग | पदाची संख्या | वेतनश्रेणी ( ७ व्या वेतन आयोगानुसार सुधारीत संरचनेतील वेतनश्रेणी) |
|---|---|---|---|
| १ | प्रधान सचिव | १ | संवर्ग पद |
| २ | सह सचिव | १ | S-२७ : ११८५००-२१४१०० |
| २ | उप सचिव | १ | S-२५ : ७८८००-२०९२०० |
| ३. | विशेष कार्य अधिकारी ( उप सचिव दर्जा गट -अ ) | २ | S-२५ : ७८८००-२०९२०० |
| ४ | अवर सचिव | १ | S-२३ : ६७७००-२०८७०० |
| ५ | वरिष्ठ स्वीय  सहायक | १ | S-२३ : ६७७००-२०८७०० |
| | कक्ष अधिकारी | ६ | S-२० : ५६१००-१७७५०० |
| ६ | निवडश्रेणी लघुलेखक | १ | S-१६ : ४४९००-१४२४०० |
| ७ | उच्चश्रेणी लघुलेखक | २ | S-१५ : ४१८००-१३२३०० |
| ८ | सहायक कक्ष अधिकरी | ९ | S-१४ : ३८६००-१२२८०० |
| ९ | संगणक सहायक | ३ | S-१४ : ३८६००-१२२८०० |
| ११ | निम्नश्रेणी लघुलेखक | ३ | S-१४ : ३८६००-१२२८०० |
| १२ | लघुटंकलेखक | १ | S-०८ : २५५००-८११०० |
| १३ | रोखपाल (लिपीक-टंकलेखक) | १ | S-०६ : १९९००-६३२०० |
| १४ | देयक-लिपीक (लिपीक-टंकलेखक) | १ | S-०६ : १९९००-६३२०० |
| १५ | लिपीक-टंकलेखक | ८ | S-०६ :१९९००-६३२०० |
| १६ | वाहन चालक | २ | S-०६ : १९९००-६३२०० |
| १७ | शिपाई | ४ | S-१ : १५०००-४७६०० |
| | **एकूण** | **४८** | **अस्थायी पदे** |

***************************